**कौटुंबिक न्यायालय, धुळे करिता फर्निचर व विद्युतीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत .**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांक: कौटुंन्या १११८/५७६/प्र.क्र.१०४/का.९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :- २९.६.२०१८

**संदर्भ** :- १) शासन निर्णय वित्त विभाग क्र. बीजीटी-२०.१०/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-२, दि.१०.०८.२०१०
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५
३) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.B(W)६०४९/२०१०/१११६/१७४२४, दि.०८.०५.२०१८
४) जिल्हा व सत्र न्यायालय, धुळे यांचे पत्र क्र.६८५७/२०१७, दि.०६.१२.२०१७

**प्रस्तावना :-**

प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांनी दि.०८.०५.२०१८च्या पत्रान्वये कौटुंबिक न्यायालय, धुळे हे कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक फर्निचर करिता रु.५,१४,३४९/- व विद्युतीकरणाच्या कामांच्या अनुषंगाने रु.२,४५,८११/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची शासनास विनंती केलेली आहे. त्यानुसार सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कौटुंबिक न्यायालय, धुळेकरीता सार्वजनिक बांधकाम विभागाने पडताळून अंतिम केल्यानुसार अंदाजपत्रकामध्ये कार्यालयीन फर्निचर करिता रु.५,१४,३४९/- (रुपये पाच लक्ष,चौदा हजार,तीनशे एकोणपन्नास फक्त) आणि विद्युतीकरणाकरीता रु.२,४५,८११/- (रूपये दोन लक्ष,पंचेचाळीस हजार,आठशे अकरा फक्त) इतक्या रकमेस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

i. कौटुंबिक न्यायालय, धुळे करिता आवश्यक फर्निचर विहित प्रमाणीकृत आकारमानाचे असावे. ते महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तीकेच्या परिशिष्ट २६ मध्ये विहित केलेल्या फर्निचरच्या प्रमाणाच्या धर्तीवर आणि प्रत्यक्ष कर्मचारी वृंदांची संख्या विचारात घेऊन निश्चित करावे.
ii. याप्रकरणी नेहमीची कार्यपद्धती आणि इतर सर्वसाधारण निर्देशांचे अनुपालन करण्यात यावे.

२. याकरिता येणारा खर्च मागणी क्रमांक जे-१, २०१४-न्यायदान, १०२-उच्च न्यायालये, (१३) १४ व्या वित्त आयोगांतर्गत योजना, (१३)(०२) कौटुंबिक न्यायालये (अनिवार्य), संकेतांक क्रमांक (२०१४ ०६०१), १३-कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३१२/इमा-२, दि.१२.६.२०१८ व वित्तीय अधिकार नियम पुस्तीका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-दोन मधील अ.क्र.३७, नियम क्र.९० आणि भाग-पहिला, उप विभाग-दोन, अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२९१४०९०५७५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2018.06.29 14:27:05 +05'30'

**(अ.श्या.कलोती)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रत आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२) प्रबंधक (निरीक्षणे १ व २), उच्च न्यायालय, मुंबई.
३) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, धुळे.
४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे.
६) वित्त विभाग (व्यय/५), मंत्रालय, मुंबई
७) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई
८) कार्यासन अधिकारी, कार्यासन २३/२४/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती-का.९.